**गोपनीय**

सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/मुंबई/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/यांच्या अधिपत्या-खालील अपदवीधर कनिष्ठ अभियंता यांची " शाखा अभियंता" म्हणून नेमणूक.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- रापद २०१०/प्र क्र १२७/आस्था-१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ फेब्रूवारी २०११.

**वाचा** : १) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. सीडीएस १५८२/१५८/(२१५)/ आ-१०,दिनांक १६.४.१९८४,
२) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. बीसीएस२४८४/१०७/आ-२, दिनांक २८.९.१९८४,
३) शासन निर्णय व आदेश, पाटबंधारे विभाग क्र. एमएससी / १०८४/६१/ आ(सं.नि.), दिनांक १६.६.१९९७,
४)शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्रमांकः- नियुक्ती १२९९/(१४/९९)/आ(शा.अ.), दिनांक ९.२.२०००.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/नाशिक/औरंगाबाद/ नागपूर यांच्या अधिपत्याखालील, सोबत जोडलेल्या **विवरणपत्र"अ"** मध्ये दर्शविलेल्या एकूण ६ अपदवीधर कनिष्ठ अभियंत्यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून "शाखा अभियंता" म्हणून नेमणूक करण्यात येत आहे.

२. शाखा अभियंता या पदासाठी दिनांक १.१.१९८६ पूर्वी रु.६००-३०-७५०-४०-९५० ही वेतनश्रेणी लागू होती. महाराष्ट्र नागरी सेवा सुधारित वेतन नियम १९८८ अनुसार शाखा अभियंता पदास दिनांक १.१.१९८६ पासून रु. २०००-६०-२३००-द.रो.७५-३२००-१००-३५०० ही वेतनश्रेणी लागू होती. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम १९९८ अनुसार दिनांक १.१.१९९६ पासून रु.६५००-२००-१०५०० ही वेतनश्रेणी लागू होती. आता महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) २००९ अनुसार दिनांक १ जानेवारी २००६ पासून रुपये ९३००-३४८०० (रु.४४०० ग्रेड पेसह) ही वेतनश्रेणी लागु झाली आहे.

३. या शासन निर्णयान्वये शाखा अभियंता म्हणून नेमणूक देण्यात आलेल्या कनिष्ठ अभियंत्याची वेतननिश्चिती, त्यांना ज्या दिनांकापासून शाखा अभियंता पदाचा दर्जा देण्यात येत आहे त्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या वेतन निश्चितीचा नियमानुसार करण्यात यावी. वेतननिश्चिती विषयीचा फेरविकल्प संबंधितांनी महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम १५ खालील टीप-४

नुसार विहित मुदतीत देणे आवश्यक आहे. या मुदतीत त्यांनी असा फेरविकल्प न दिल्यास त्यांनी नवीन पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून वेतननिश्चितीचा विकल्प दिला आहे असे समजण्यात येईल.

४. जर संबंधीत कनिष्ठ अभियंता, विभागीय परिक्षा आणि मराठी/हिंदी भाषा परिक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा अशा परिक्षा उत्तीर्ण होण्यातून त्यांना सूट देण्यात आली नसेल तर त्यांना शाखा अभियंता पदाचा दर्जा दिल्याच्या दिनांकापासून शाखा अभियंता पदाची वेतनश्रेणी लागू करावी. परंतु त्यांना पुढील वेतनवाढी देण्यात येवू नयेत. त्यांनी विभागीय परिक्षा आणि मराठी/हिंदी भाषा या तीनही परिक्षा उत्तीर्ण झाल्यानंतरच अथवा वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्याने सदर परिक्षा उत्तीर्ण होण्यातून सुट देण्यात आलेल्यांना, वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर दिनांकापासून / शाखा अभियंता पदाची वेतनश्रेणी दिल्याच्या दिनांकापासून नियमित वेतनवाढी दिल्या आहेत असे गृहित धरून होणारे वेतन देण्यात यावे. त्यांना वरील प्रमाणे गणना केलेल्या काल्पनिक वेतनवाढीची थकबाका अनुज्ञेय असणार नाही.

७. उपरोक्त नेमणुका महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून असतील.

८. शाखा अभियंता या संवर्गातील सदर अभियंता यांची आपापसातील ज्येष्ठता यथावकाश स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येईल.

९. सदर शासन निर्णय शासनाच्या **W.W.W.Intranet.Maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यैंत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०२१४१९१८५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सहपत्र : विवरणपत्र - 'अ'**

(अ. मा. काळे)
कार्यासन अधिकारी.

**प्रत,**

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, **(पत्राने)**
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, नाशिक,औरंगाबाद, नागपूर.
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,मुंबई,नाशिक,औरंगाबाद, नागपूर
सर्व संबंधित कनिष्ठ अभियंता **व्दारा -** संबंधित मुख्य अभियंता, कार्यासन अधिकारी, सेवा-६ / आस्था-३ , सा.बां.वि. मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

अध्यक्ष, कनिष्ठ अभियंता संघटना, महाराष्ट्र राज्य,
व्दारा - अमरावती डिस्ट्रीक्ट इंजिनिअर्स क्रेडिट को.ऑप. सोसायटी लिमिटेड,
पाटबंधारे कॉलनी, शिवाजीनगर, अमरावती- ४४४ ६०३.

**प्रत,**

आस्था-१ कार्यासन (संग्रहार्थ २ प्रति).

D:\common\LAD\CR 62 Astha-1 GR.doc

## विवरणपत्र 'अ'

शासन निर्णय क्रमांक रापद-२०१०/प्र.क्र.१२७/आस्थापना-१

दिनांक १४/२/२०११.

| अ.क्र. | कनिष्ठ अभियंत्यांचे नांव | प्रादेशिक विभाग | शैक्षणिक अर्हता | जन्म दिनांक | कनिष्ठ अभियंता पदावरील नेमणुकीचा दिनांक | शाखा अभियंता दर्जा देय दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.दिलीप गोविंद बिजवे | नागपूर | अर्हतारहित | १९.११.६१ | २९.८.९६ | १.४.०७ | |
| २ | श्रीमती आर.जी.चारथड(पुनसे) | नागपूर | डी.सी.ई | २२.८.७४ | २०.११.०३ | १.४.०९ | |
| ३ | श्री.ज्ञानेश्वर शांताराम सोनावने | नाशिक | डी.सी.ई | १.६.७५ | ९.१२.०४ | १.४.१० | |
| ४ | श्री.गुणवत नागनाथ चिंताले | औरंगाबाद | डी.सी.ई | २५.५.८० | १६.८.०३ | १.४.०९ | |
| ५ | श्री.वाय.डी.रामटेके | नागपूर | डी.सी.ई | ७.७.५७ | ११.४.८४ | १.४.९० | |
| ६ | श्री.सु.भा.सुरवाडे | मुंबई | डी.सी.ई | १७.७.७१ | १४.११.०३ | १.४.०९ | |